सन २०१९-२० या वित्तीय वर्षासाठी महाराष्ट्र राज्य महिला आयोगास निधी वितरीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महिला व बाल विकास विभाग

### शासन निर्णय क्रमांक-रामआ-२०१९/प्र.क्र.७०/का-१०

नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख-२० मार्च, २०२०.

**वाचा :-**

१. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८ जुलै, २०१९.
२. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र.रामआ-२०१९/प्र.क्र.७०/का-१०, दि.१ ऑगस्ट, २०१९.
३. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.२२ जानेवारी, २०२०.

**प्रस्तावना :-**

सन २०१९-२० या वित्तीय वर्षासाठी २२३५-२१६१ या संगणक संकेतांकाखाली ३१ सहायक अनुदन (वेतनेत्तर) बाबीसाठी ₹५,६६,५०,०००/- (अक्षरी रुपये पाच कोटी सहासष्ट लक्ष पन्नास हजार फक्त) इतकी तरतूद मंजूर आहे. सदर निधीपैकी संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये अर्थसंकल्पीय तरतुदीच्या ६०% च्या मर्यादेत ₹३,३९,९०,०००/- (अक्षरी रुपये तीन कोटी एकोणचाळीस लक्ष नव्वद हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. सदर लेखाशिर्षाखालील मुळ अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी उर्वरीत निधी ₹२,२६,६०,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी सव्वीस लाख साठ हजार फक्त) इतका निधी महाराष्ट्र राज्य महिला आयोगास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य महिला आयोगातील वेतनेत्तर बाबींसाठी **₹२,२६,६०,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी सव्वीस लाख साठ हजार फक्त)** इतका निधी महाराष्ट्र राज्य महिला आयोगास वितरित करण्यास याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी महाराष्ट्र राज्य महिला आयोगास वितरित करण्यासाठी जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. आहरण व संवितरण अधिकारी यांनी हा निधी महाराष्ट्र राज्य महिला आयोगास वितरीत करावा. तथापि, सदरचा निधी कोषागारातून एकदम आहरित न करता महाराष्ट्र राज्य महिला आयोगाची खर्चाची / निधीची आवश्यकता तपासून जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर (आहरण व संवितरण अधिकारी) यांनी खर्चाचे देयक कोषागारात सादर करावे. जेणेकरुन विनाकरण निधी महाराष्ट्र राज्य महिला आयोगाकडे शिल्लक राहणार नाही, याची दक्षता घ्यावी. तसेच याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालयास सादर करण्याची दक्षता सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग व आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी घ्यावी. खर्चाचे प्रयोजन नसताना सदर निधी एकत्रितरित्या आहरित करुन महाराष्ट्र राज्य महिला आयोगाने त्यांच्या बँक खात्यात जमा केल्यास या अनियमिततेची संपूर्ण जबाबदारी नियंत्रक अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

४. सदर रक्कम मागणी क्र.एक्स-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाजकल्याण १०३, महिला कल्याण (११) (०१) महाराष्ट्र राज्य महिला आयोगाला अनुदाने (अनिवार्य) (२२३५ २१६१), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० मध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या तरतूदीतून खर्च करण्यात यावी.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८ जुलै, २०१९ रोजीच्या परिपत्रकातील परिच्छेद क्र.४ ते १९ मधील मार्गदर्शक सूचना व त्या विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन तसेच वित्त विभागाच्या क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.१३ मार्च, २०२० रोजीच्या परिपत्रकास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००३२०१६५७२७०४३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA
SITARAM JARANDE

Digitally signed by RAVINDRA SITARAM JARANDE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=186d0f0fdd27c79b9b3f859a90ec537946c37d5876e64ce525d082e58e494c85, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBA,
serialNumber=4d2dc3dbd5c0f35a66a84c93b4cead367c64cc2bc9d7391e9a053988a2f81b64, ou=WOMEN AND CHILD DEVLOPMENT,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAVINDRA SITARAM JARANDE
Date: 2020.03.20 16:58:42 +05'30'

**( र.सि.जरांडे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
३. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
४. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
७. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर
८. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सदर निधी बी.डी.एस. प्रणालीवर वितरीत करण्याच्या विनंतीसह अग्रेषित.
११. निवड नस्ती, का-१०.